# बंगाली भाषा प्रवेश

## मराठी माध्यमाच्या द्वारा

### खंड १


संपादक-लेखक

श्री. सतीन्द्रनाथ गजानन सुखठणकर


महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

१९७३

# बंगाली भाषा प्रवेश

## मराठी माध्यमाच्या द्वारा



खंड १

संपादक - लेखक

श्री. सतीन्द्रनाथ गजानन सुखठणकर

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ

१९७३

पहिली आवृत्ती : जानेवारी १९७३
(पौष, १८९४)

प्रकाशक :
सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ
सचिवालय, मुंबई-३२

मुद्रक :
केशव चौधरी
निदेशक,
आंतर भारती मुद्रणालय,
२६४, ए टू शेड इंडस्ट्रीयल इस्टेट,
फर्ग्युसन रोड, लोअर परेल, मुंबई-१३.
* * * * *
४२, ग. द. आंबेकर मार्ग, वडाळा, मुंबई-३१

किंमत : १६ रुपये

## —: निवेदन :—

भारत हे बहुभाषी राष्ट्र आहे. भारताची राष्ट्रीय एकात्मता ही पश्चिमी देशातील 'एकराष्ट्र एकभाषा' अशा समीकरणाची नाही. येथे वैविध्यपूर्ण व साहित्यसंपन्न अशा १५ इतर भाषा आहेत. या भाषांची व साहित्याची वाढ मुख्यत: संस्कृत भाषेच्या व साहित्याच्या प्रभावाखाली झाली आहे. इंग्रजी राज्य झाल्यानंतरच्या काळात पश्चिमी संस्कृतीच्या, पश्चिमी ज्ञानाच्या व आधुनिक शिक्षणाच्या व्दारा विचार व भावना यांचे संवादित्व या भारतीय भाषांमध्ये निर्माण होऊ लागले आहे. स्वातंत्र्याच्या आंदोलनाने व राजकीय एकात्मतेमुळे या भाषांचे वैचारिक संबंध अधिक निकटचे बनले आहेत. परंतु या भाषांचा भाषिक सीमाप्रदेश सोडल्यास, अन्योन्यसंबंध फार थोडा आहे. परंपरागत धर्म आणि इंग्रजी भाषा यांच्या द्वारेच वैचारिक, भावनात्मक व सांस्कृतिक मूल्यांची देवघेव होत आहे. ही देवघेव मोठ्या प्रमाणात होणे आपल्या सांस्कृतिक प्रगतीचा वेग वाढविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेच. परंतु, त्याहीपेक्षा भारताची राष्ट्रीय एकात्मता दृढ व अभेद्य बनविण्याकरिता अधिक आवश्यक आहे. याकरिता, महत्वाचा उपाय म्हणजे प्रादेशिक मातृभाषा बोलणाऱ्या लोकसमूहांमध्ये लगतच्या किंवा दूरच्या भारतीय प्रदेशांच्या भाषा उत्तम रीतीने अवगत केलेले, त्यापैकी एक किंवा अनेक भाषा उत्कृष्ट रीतीने लिहू किंवा बोलू शकणारे आणि त्याचप्रमाणे त्या त्या अन्य प्रादेशिक भाषेतील प्रथितयश लेखांचे, ग्रंथांचे व ग्रंथकारांचे साहित्य स्वत:च्या प्रादेशिक मातृभाषेत चांगल्या रीतीने भाषांतरित व रुपांतरित करण्यास समर्थ असलेले सुशिक्षित निर्माण होण्याची मोठी निकड आहे.

ही निकड भागविण्याची पहिली पायरी म्हणून महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने आपली "आंतरभारती" ची योजना आखली आहे. या योजनेप्रमाणे सुशिक्षित मराठी मनुष्यास गुजराथी, उर्दू, बंगाली, कानडी इत्यादी इंडोआयर्न व द्राविडी भाषा स्वतंत्रपणे शिकता याव्या म्हणून प्रत्येक भाषेचे द्विभाषिक शब्दकोश (दोन्ही प्रकारचे म्हणजे गुजराथी - मराठी

मराठी - गुजराती असे) भाषा प्रवेश आणि साहित्य-परिचय अशी चार पुस्तके प्रकाशित करण्याचे ठरविले आहे. या कार्यक्रमानुसार मंडळाच्या वतीने गुजराती - मराठी शब्दकोश', 'उर्दू - मराठी शब्दकोश', 'कानडी - मराठी शब्दकोश', 'गुजराती भाषाप्रवेश' 'कानडी साहित्य परिचय' हे ग्रंथ आधीच प्रकाशित झाले असून अन्य काही भाषांचे द्विभाषिक शब्दकोश, व साहित्य परिचय मुद्रणावस्थेत आहेत व काही संपादित होत आहेत.

मंडळाच्या आंतरभारती योजनेखाली "बंगाली भाषाप्रवेश" प्रकाशित करतांना मंडळास आनंद होत आहे. मंडळासाठी प्रस्तुत भाषाप्रवेश श्री. स. ग. सुखठणकर यांनी तयार केला आहे. सदर भाषाप्रवेश बंगाली भाषेचे अध्ययन करण्यास मराठी वाचकांस उपयुक्त होईल असा मंडळाचा विश्वास आहे. श्री. सुखठणकर यांनी मोठ्या आस्थेने व परिश्रमपूर्वक हे काम केले याबद्दल यांचे मंडळ आभारी आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी,**

वाई, अध्यक्ष,

दि. ४ जानेवारी १९७३. महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

# अनुक्रमणिका



## भाग पहिला

### वर्णमाला



## भाग दुसरा

### व्याकरण

# प्रस्तावना

चालू काळात निरनिराळ्या भाषांचे ज्ञान असणे किती आवश्यक आहे हे काही पटवून देण्याची आवश्यकता नाही. शालांत परीक्षेपर्यंत प्रत्येकजण मराठी, हिंदी, संस्कृत व इंग्रजी ह्या चार भाषा शिकतोच. ह्याखेरीज केंद्रसरकारने मान्यता दिलेल्या इतर भाषांपैकी निदान एकतरी भाषा स्वतःस सुशिक्षित म्हणविणाऱ्या प्रत्येकाने शिकावी. इतर भाषा शिकणे ह्याचा अर्थ आपल्या मातृभाषेचा अभिमान आपण न बाळगणे असा नाही. आपल्या मातृभाषेचा अभिमान जरूर असावा परंतु इतर भाषांविषयींही उदासीन राहू नये. इतर भारतीय भाषा शिकताना आपल्याला विशेष अशा अडचणीही येण्याचे कारण नाही. भारतांतील सर्व भाषांत संस्कृत शब्द विपुल प्रमाणात असल्यामुळे स्वतःकडे त्या भाषेचा नाही म्हटले तरी थोडाबहुत शब्द-संग्रह असतोच. केवळ उच्चारात व लिपीत फरक असल्यामुळे ही गोष्ट आपणास जाणवत नाही. त्यामुळे शिकावयाच्या दृष्टीने उरणाऱ्या मुख्य बाबी म्हणजे शब्दरूपे, निरनिराळ्या काळांतील क्रियापदांची रूपे व इतर थोडेसे व्याकरण ह्या बाबतीत जर योग्य मार्गदर्शक मिळाला तर केवळ त्या भाषेचे जुजबीच ज्ञान न होता अल्पावकाशात तीवर प्रभुत्व मिळविणेही सहज शक्य होते. इतर भाषांच्या अभ्यासाने आपल्या मातृभाषेची समृद्धि आपणांस साधता येते, तसेच निरनिराळ्या भाषिक घटकांतील एकतेची भावनापण वाढीस लागते. बंगाली ही एक संपन्न भाषा असल्यामुळे बंगालीचा अभ्यास ह्या दृष्टीने मराठी भाषिकांनी करणे अगत्याचे आहे.

निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या लोकांच्या संख्येच्या हिशेबाने पाहता बंगाली भाषेचा जगात सातवा क्रमांक लागतो. चिनी, इंग्रजी, रशियन, जर्मन जपानी व स्पॅनिश ह्या भाषांनंतर बंगालीचे स्थान आहे. भारतांत हिंदीचा प्रसार जरी खूप असला तरी ज्यांची मातृभाषा हिंदी आहे त्यांची संख्या, ज्यांची मातृभाषा बंगाली आहे त्यांच्यापेक्षा कमी आहे असा बंगाली लोकांचा दावा आहे. बंगाली भाषा ही आसाममधील मणीपुरचा थोडासा भाग, काछाड, श्रीहट्ट (सिल्हेट), पश्चिम गोयालपाडा, बांगला देश, पश्चिम बंगाल, छोटा

नागपुरमधील संथाळ परगणा, पुर्णिया मानभूम व सिंहभूम ह्या भागांत बोलली जाते. जवळजवळ तेरा कोटी लोकांची ही मातृभाषा आहे. वंगलिपीचा उपयोग तर बंगाली भाषेखेरीज, आसामी व मणीपुरी भाषांत पण (एखादे अक्षर वगळता) करतात. त्यामुळे बंगाली भाषेपेक्षाही तिच्या लिपीचे क्षेत्र अधिक विस्तृत आहे.

बंगाली भाषेतील वाङमय हे जगांतील श्रेष्ठ भाषांच्या तोडीस बसणारे आहे. अन्य भारतीय भाषांत तर तिने श्रेष्ठ स्थान पटकावले आहे. त्यामुळे बंगाली भाषेंतील पुस्तकांची इतर भारतीय भाषांत (इंग्रजीतसुद्धा) जेवढी भाषांतरे झालेली आहेत, तेवढी इतर भारतीय भाषांतील पुस्तकांची झालेली नाहीत असे म्हटल्यास ते गैर ठरणार नाही. श्रीमद्भगवद्गीतेप्रमाणेच रवींद्रनाथ ठाकुरांच्या 'गीतांजली'चे पण सर्व प्रमुख जागतिक भाषांत भाषांतर झालेले आहे.

बंगाली भाषा ही सध्या इंग्लंड, जर्मनी, अमेरिका, फ्रान्स, रशिया, जपान, ऑस्ट्रिया इत्यादि देशांच्या विद्यापीठांतून शिकविली जाते. हा मान संस्कृत-खेरीज इतर कोणत्याही भारतीय भाषेला मिळालेला नाही. सबंध आशिया खंडांत तर बंगाली भाषेलाच 'नोबेल' पारितोषिक मिळण्याचा मान मिळालेला आहे. ह्याविषयी अतुलप्रसाद सेन बंगाली भाषेला उद्देशून म्हणतातः—

"বাজিয়ে রবি তোমার বীণে
আনলে মালা জগৎ জিনে।"

बाजिये रवि तोमार वीणे
आनले माला जगत जिने।

[अर्थः- रवींद्रनाथांनी तुझी वीणा वाजवून (बंगालीत काव्य करून) जग जिंकून माळ (नोबेल पारितोषिक) आणली.]

केवळ साहित्यच नव्हे तर चित्रसृष्टि, नाट्य इत्यादि सर्वच क्षेत्रांत बंगाली लोक इतर भारतीयांपेक्षा पुढारलेले आहेत हे दरवर्षी त्यांना मिळणाऱ्या सरकारी पारितोषिकांवरून दिसून येते.

वंगभंग आंदोलनापासून महाराष्ट्र व बंगाल हे राजकीय दृष्ट्या एकत्र आले. त्यासुमारासच बंगाली साहित्याचा मराठीत अनुवाद व्हावयाला सुरवात

झाली. माधवानुज डॉ. काशीनाथ हरि मोडक (१८७२-१९१७) ह्यांनी मायकेल मधुसूदन दत्त ह्यांच्या 'मेघनाद वध' ह्या बंगाली काव्याचा अनुवाद केला. गोविंद केशव कानिटकर (१८५४-१९१८) ह्यांनी विश्वकवि* रवींद्रनाथ ठाकूर ह्यांच्या 'गीतांजली'चें रुपान्तर केले. दत्तात्रय माधव कुळकर्णी ह्यांनी रवींद्रनाथांच्या 'बउ ठाकुरानीर हाट' ह्या कादंबरीवर आधारलेली 'विभा' कादंबरी लिहिली. वासुदेव गोविंद आपटे ह्यांनी साहित्यसम्राट्* बंकिमचंद्रांच्या सर्व कादंबऱ्यांची मराठी वाचकांस ओळख करून दिली. तीसपस्तीस वर्षांपूर्वी शं. बा. शास्त्री ह्यांनी कथाशिल्पी* शरत्‌चंद्राच्या काही दीर्घ कथांचा अनुवाद प्रसिद्ध केला. वि. सी. गुर्जर, पु. बा. कुळकर्णी ह्यानी शरद्‌बाबूंच्या काही कथा कांदबऱ्यांचे मराठी अनुवाद केले. आणि मामा वरेरकरांसारख्या ज्येष्ठ साहित्यिकाने तर जवळजवळ संपूर्ण शरद्‌बाबूच मराठी वाचकांना उपलब्ध करून दिला आहे. शरद्‌बाबूंच्या व बंकिमचंद्रांच्या साहित्याच्या मानाने रवींद्रनाथांच्या साहित्याचा मराठीत अजून फारसा अनुवाद झालेला नाही. मराठीतील लो. टिळकांचे 'गीतारहस्य', पूज्य साने गुरुजींचे 'श्यामची आई' व पूज्य विनोबाजी ह्यांच्या पुस्तकांचे बंगालीत अनुवाद झालेले आहेत. रवींद्रनाथांनी मराठ्यांच्या इतिहासावर बंगालीत पुष्कळ कविता केल्या आहेत. संत तुकारामाच्या काही अभंगांचा पण त्यानी बंगालीत अनुवाद केला आहे. (त्यापैकी एका अभंगाचा अनुवाद परिशिष्टात देण्यात आला आहे.) महाराष्ट्राच्या दृष्टीने अभिमानाची बाब म्हणजे कै. सखाराम गणेश देऊस्कर (१८६९-१९१२) ह्यानी केलेली वंगभाषेची सेवा ही होय. [ह्यांचा जन्म वैद्यनाथला झाला व कायम वास्तव्य बंगालमध्येच होते. लहानपणापासूनच त्यांना बंगाली साहित्याची आवड होती.] वंगभंग आंदोलनाच्या सुमारासच इ. स. १९०५ मध्ये 'हितवादी ह्या बंगाली पत्रिकेचे ते संपादक झाले. त्यानी बंगालीत पुढील पुस्तके लिहिली आहेत :— (१) देशेर कथा (२) झांसीर राजकुमार (३) महामति रानाडे (४) एटा कोन युग (५) बाजीराओ (६) शिवाजी उत्सव (७) वंगीय हिंदुजाति कि ध्वंसोन्मुख त्यां पैकी 'महामति रानाडे' व 'एटा कोन युग' ही पुस्तके विशेष प्रसिद्ध होती.

[* बंगाली लोकांनी रवींद्रनाथ ठाकुरांना 'विश्वकवि', बंकिमचंद्रांना 'साहित्यसम्राट' व शरत्‌चंद्रांना 'कथाशिल्पी' अशा पदव्या दिल्या आहेत.]

'देशेर कथा' हे पुस्तक अलिपुर बाँब खटल्यात सरकारने जप्त केले. त्याकाळी बंगालमध्ये ते खूप प्रसिद्ध होते, मोठमोठ्या बंगाली पुढाऱ्यांशी व साहित्यिकांशी त्यांची ओळख होती. बंगभंग आंदोलनाच्या सुमारास सुरू झालेल्या बंगाल मधील शिवाजी उत्सवाचे ते अध्वर्यु होते. त्यांच्याच आग्रहावरून रवींद्रनाथांनी आपली 'शिवाजी उत्सव' ही गाजलेली कविता लिहिली. ह्या कवितेत बंगाली लोकांना उद्देशून रवींद्रनाथ म्हणतात :—

"মারাঠির সাথে আজি হে বাঙালি, এক কণ্ঠে বলো
'জয়তু শিবাজি'।
মারাঠির সাথে আজি হে বাঙালি, এক সঙ্গে চলো
মহোৎসবে সাজি।"

माराठिर साथे आजि हे बाडालि, एक कण्ठे बलो
'जयतु शिवाजि'।
माराठिर साथे आजि हे बाडालि, एक संगे चलो
महोत्सवे साजि।

[अर्थ :– हे बंगाली लोकांनो, मराठी लोकांबरोबरच एका आवाजात 'जयतु शिवाजी' म्हणा आणि त्यांच्याबरोबरच महोत्सवाला सजून चला.]

## बंगाली भाषेची उत्पत्ती

प्राचीन भारतांत चार प्रकारच्या भाषा होत्या. (१) आर्यभाषा (इंडो-युरोपीय) (२) द्रविड (३) ऑस्ट्रिक (४) मंगोलीय. आर्यांची भाषा किंवा वैदिकभाषा (ही मौखिक होती) ही आर्यलोक उत्तर हिंदुस्थानांत पसरल्या-वर त्यांचा अनार्यांशी संबंध आल्यामुळे विकृत झाली. खि. पू. ५ व्या शतकांत पाणिनीने आपला सुप्रसिद्ध 'अष्टाध्यायी' हा ग्रंथ तयार केल्यावर तिला सूत्रबद्ध स्वरूप प्राप्त झाले. ह्या नवीन भाषेचे नांव 'संस्कृत' भाषा होय. कालक्रमे ह्या संस्कृत भाषेचे प्राकृतात रूपांतर झाले. [काही भाषापंडितांचे प्राकृत ही एक स्वतंत्र भाषा आहे असे मत आहे.] ही प्राकृत भाषा पुढे निरनिराळ्या प्रदेशांत निरनिराळ्या रीतीने बोलली जाऊ लागल्यामुळे तिच्या अनेक शाखा निर्माण

झाल्या. त्यांतील मुख्य शाखा (१) मागधी (२) शौरसेनी व (३) महाराष्ट्री ह्या होत. ह्यांच्यातही पुढे फेरफार होऊन सध्यांच्या भाषा तयार झाल्या. वैदिक भाषेपासून हल्लीच्या प्रादेशिक भाषांपर्यंत जे स्थित्यंतर होत गेले त्याची पुढील प्रमाणे तीन युगे स्पष्टपणे दिसून येतात.

[१] वैदिक भाषा किंवा आर्य भाषा (खि. पू. १५०० ते खि. पू. ६००)

[२] प्राकृत (खि. पू. ६०० ते इ. स. १०००)

[३] भाषा (इ. स. १००० पासून आतापर्यंत)

प्राकृत व भाषा ह्यांच्या मधल्या काळास (इ. स ३०० ते इ. स. १०००) अपभ्रंशाचे युग म्हणतात. कारण ह्याच काळांत प्राकृतच्या अपभ्रंशाने इतर भाषांची उत्पत्ती झाली.

'महाराष्ट्री प्राकृत' पासून 'महाराष्ट्री अपभ्रंश' व त्यापासून पुढे मराठी भाषेची उत्पत्ती झाली. तर मगधात प्रचलित असलेल्या 'मागधी प्राकृत' पासून 'मागधी अपभ्रंश' व त्यापासून ज्या भाषा तयार झाल्या त्यात बंगाली भाषेचा समावेश होतो. बंगाली भाषेची उत्पत्ती इ. स. च्या ९ व्या शतकात झाली असे मानतात. परंतु वंगदेशातील व्यावहारिक लेखी भाषेला इ. स. १३०० ते १५०० च्या दरम्यान सुरवात झाली. ह्यानंतर तिच्यात थोडे थोडे फेरफार होत तिला सध्याचे वैभवशाली स्वरूप प्राप्त झाले.

## वंगलिपीची उत्पत्ती

भारताच्या प्राचीनतम लिपीचे नांव ब्राह्मी लिपि. ही ब्राह्मी लिपि अत्यंत सरळ व अक्षरांना जोडणारी रेष नसलेली (गुजराती लिपिप्रमाणे) अशी होती. सम्राट् हर्षवर्धनच्या काळात (इ. स. च्या ७ व्या शतकात) ब्राह्मी लिपि तीन शाखात विभागली गेली व ती निरनिराळ्या प्रकारांनी लिहू जाऊ लागली. (ह्याच सुमारास अक्षरांना जोडणारी रेष लिहिण्यांत येऊ लागली.) त्या तीन शाखा पुढीलप्रमाणे आहेतः—

(१) **उदीच्य** (उत्तर-पश्चिमेकडील):—ह्या शाखेच्या लिपीचे नांव 'शारदा-लिपी' हिच्यापासून काश्मीरी व गुरुमुखीची उत्पत्ती झाली.

(२) **प्रतीच्य** (पश्चिमेकडील) :—ह्या शाखेच्या लिपीचे नांव 'नागरलिपी' ह्यापासूनच देवनागरीची उत्पत्ती झाली. मराठी, गुजराती व राजस्थानी लिप्या देवनागरीच्या थोड्याशा फरकाने उत्पन्न झाल्या आहेत.

(३) **प्राच्य** (पूर्वेकडील) :—ह्या शाखेच्या लिपीचे नांव 'कुटिललिपी'. हिच्या मात्रा व वर्ण कुटिल असल्यामुळेच हिला हे नाव प्राप्त झाले. ह्या कुटिल लिपीपासूनच आधुनिक बंगाली, आसामी, ओरीया व मैथिली लिपींचा विकास झाला. (आसामी वंगलिपीतच लिहिली जाते, फक्त 'ब' ह्या अक्षरात फरक आहे.) वंगलिपि ही प्रायः १००० वर्षांपासून प्रचलित आहे. इ. स. च्या ९ व्या शतकांत पाल घराण्यातील राजा नारायण पाल ह्याच्या अमदानीतील भागलपूर जिल्ह्यातील ताम्रपटावर बंगाली लिपि सर्व प्रथम दिसून येते. ह्यानंतरच्या काळात तिच्यात थोडा थोडा बदल होत तिला हल्लींचे स्वरूप प्राप्त झाले आहे.

वंगलिपिचें वैशिष्टय असे आहे की इतर भाषांतील शब्द त्या लिपीत लिहिता येणार नाहीत (उच्चार वेगळे होतील) व बंगाली शब्द (उच्चारांप्रमाणे) इतर लिपीत लिहिता येणार नाहीत.

## बांग्ला (বাংলা) नांवाची उत्पत्ती

बंगाली लोक स्वतःच्या भाषेला 'बांग्ला' भाषा असे म्हणतात. परंतु हे नाव मात्र त्यांनी स्वतः दिलेले नाही. बंगालमध्ये मुसलमानांचा प्रवेश होण्यापूर्वी जो बंगालचा भाग (पूर्व बंगाल) अर्थात बांगला देश आहे त्याला 'वंग' व हल्लीच्या पश्चिम बंगालला 'गौड' असे नामाभिधान होते. मुसलमानी अमदानींत हल्लींच्या पूर्व पाकिस्तान व आसपासच्या भूभागाला 'बांगला' (বাংলা) हे नाव पडले. मुसलमान लोक त्या भागांतील भाषेला 'जबान-इ-बांग्ला' असे म्हणत. (ह्यापासूनच पुढे 'बांग्ला' असे म्हणण्यात येऊ लागले.) सर्वसाधारण माणसे तिला 'भाषा' म्हणत तर भाषापंडित तिला 'प्राकृत' म्हणत. इ. स. च्या १६ व्या शतकापासून ते इ. स. च्या १९ व्या शतकापर्यंत तिला 'गौडभाषा' असे म्हटले जाई. हल्ली 'बांग्ला' (বাংলা, বাঙালা) हेच नाव सर्वत्र वापरले जाते.

## बंगाली भाषेतील शब्दसंभार

बंगाली भाषेत प्रायः सव्वा लक्ष शब्द आहेत. त्यांची वर्गवारी पुढील प्रमाणे करण्यांत येते.

(१) तत्सम शब्द (संस्कृत) ४४%

(२) तद्भव व देशी शब्द ५१.४५%

(३) विदेशी शब्द (फारशी-अरबी-तुर्की) ३.३०% यापैकी सुमारे २५०० शब्द फारशी, ३०० शब्द अरबी व ४० शब्द तुर्की आहेत. मुसलमान राज्यकर्त्यांनी फारशी ही राज्यकारभारची भाषा केल्यामुळे कायदा, अंमलबजावणी व जमीनमहसुलाबाबतचे शब्द फारशी आहेत. मुसलमान धर्माची भाषा अरबी असल्यामुळे तद्विषयक शब्द अरबी आहेत. युद्धविषयक शब्द तुर्की आहेत.

(४) अन्य विदेशी शब्द १.२५%

यात मुख्यत: इंग्रजी भाषेतील शब्दांचा भरणा आहे. सुमारे १०० वर पोर्तुगीज शब्द व इतर किरकोळ शब्द डॅनिश, डच, फ्रेंच व मलायी भाषेतील आहेत.

[ हा हिशोब स्वर्गीय ज्ञानेंद्रमोहन दास ह्यांच्या 'বাংলা ভাষার অভিধান' (बांगला भाषार अभिधान) ह्या शब्दकोशावरून डॉ. सुनीतिकुमार चटोपाध्याय ह्यांनी केला आहे.]

ह्यावरून असे दिसून येते की संस्कृत भाषेतून बंगाली भाषेत घेतलेल्या शब्दांची संख्या संस्कृत भाषेतून मराठीत घेतलेल्या शब्दांपेक्षा पुष्कळच अधिक आहे. ह्या शब्दांचा वापरही बंगालीत अगदी सामान्य रीतीने होतो. खाली दिलेल्या शब्दावरून त्याची कल्पना येईल. [ मूळ बंगाली शब्दासमोर तोच शब्द देवनागरी लिपीत लिहिला असून त्याचा अर्थ दिला आहे.]

| | | |
|---|---|---|
| অনুষ্ঠান | अनुष्ठान | समारंभ, धर्मकृत्य |
| অদ্ভুত | अद्भुत | आश्चर्यकारक |
| অভিমান | अभिमान | अहंकार, अभिमान |
| অল্প | अल्प | थोडे |
| আপত্তি | आपत्ति | संकट |

| কিন্তু | किन्तु | परंतु |
|---|---|---|
| ক্রোড়পত্র | क्रोडपत्र | पुरवणी |
| গণ্ডুষ | गण्डूष | चूळ, घोंट |
| গল্প | गल्प | गोष्ट |
| চমৎকার | चमत्कार | आश्चर्य |
| নিশ্চয় | निश्चय | निश्चय |
| পরিষ্কার | परिष्कार | साफ, स्वच्छ |
| প্রচুর | प्रचुर | पुष्कळ |
| প্রবীণ | प्रवीण | कुशल |
| প্রয়োজন | प्रयोजन | आवश्यकता |
| বিজ্ঞ | विज्ञ | ज्ञानी, तज्ज्ञ |
| বিজ্ঞাপন | विज्ञापन | जाहिरात |
| ভদ্র | भद्र | सभ्य, चांगला |
| রৌদ্র | रौद्र | भयानक |
| শক্ত | शक्त | कठिण, मजबूत |
| সৎকার | सत्कार | सत्कार |
| হিংসা | हिंसा | हिंसा |

ह्याचप्रमाणे मराठीत मुळींच वापरण्यात न येणाऱ्या संस्कृत शब्दांचा पण बंगालीत अगदी सामान्य रीतीने वापर करतात. खाली दिलेल्या शब्दावरून याची कल्पना येईल.

| অনতিক্রম | अनतिक्रम | न ओलांडणे |
|---|---|---|
| অনতিদূর | अनतिदूर | जवळ |
| অনতিবিলম্বে | अनतिविलंबे | लवकर |
| অনল্প | अनल्प | अधिक, पुष्कळ |
| নাতিদূর | नातिदूर | जवळ |
| নাতিবিলম্বে | नातिविलंबे | लवकर |
| নাতিশীতোষ্ণ | नातिशीतोष्ण | कोमट |
| নাতিস্থূল | नातिस्थूल | मध्यम बांध्याचा |

संस्कृत भाषेतून बंगालीत घेतलेल्या शब्दांचा संस्कृतमधील अर्थाबरोबरच खास बंगाली असा वेगळाही अर्थ होऊं शकतो. खालीं दिलेल्या शब्दांवरून त्याची कल्पना येईल.

| | | |
|---|---|---|
| অভিমান | अभिमान | रुसवा |
| আপত্তি | आपत्ति | हरकत |
| চমৎকার | चमत्कार | आश्चर्यकारक वाटावे इतके छान, सुंदर |
| নিশ্চয় | निश्चय | निश्चित, नक्की |
| প্রবীন | प्रवीण | वृद्ध, अगोदरचा (Senior) |
| রৌদ্র | रौद्र | ऊन |
| সৎকার | सत्कार | शवदहन, अंत्येष्टिक्रिया |
| হিংসা | हिंसा | मत्सर |

संस्कृतमधून बंगालीत घेतलेल्या काही शद्बांचा अर्थ मराठीतील रूढ अर्थापेक्षा अगदी वेगळा होतो. खाली दिलेल्या शद्बांवरून त्याची कल्पना येईल.

| | | |
|---|---|---|
| উদ্গার | उद्गार | ढेकर, ओकारी |
| কদাচিৎ | कदाचित् | क्वचितच |
| কর্কশ | कर्कश | ओबडधोबड, निष्ठुर |
| কৌতুক | कौतुक | मौजमजा, थट्टा, कुतुहल |
| চিন্তা | चिंता | विचार |
| চেষ্টা | चेष्टा | प्रयत्न |
| ছত্র | छत्र | ओळ |
| দ্রব্য | द्रव्य | वस्तु |
| বিলক্ষণ | विलक्षण | पुष्कळ, चांगल्या रीतीने |
| ভাবনা | भावना | काळजी |
| যাতাযাত | यातायात | ये–जा |

## बंगाली भाषचे प्रकार

शिष्ट साहित्यात व शिक्षित समाजात प्रचलित असलेल्या बंगाली भाषेचे दोन प्रकार आहेत. (१) साधु भाषा ( **সাধু ভাষা**; *Standard Literary Language*) (२) चलित भाषा ( **চলিত ভাষা**; *Standard Colloquial Language*)

**साधु भाषा** :–बंगालची साहित्यिक भाषा म्हणून प्रथम साधु भाषेलाच मान होता. गद्यसाहित्य व पत्रे वगैरे ह्याच भाषेत लिहिली जात. ह्या

भाषेचे व्याकरण सुनियंत्रित आहे, तसेच भाषेच्या वापरात गुंतागुंतही नाही. ह्या भाषेत संस्कृत शद्बांचा वापर फार करतात. बंकिमचंद्रांचे व त्यांच्या अगोदरच्या लेखकांचे सर्व साहित्य साधुभाषेत आहे. हल्ली ही भाषा केवळ वृत्तपत्रे व शास्त्रीय ग्रंथापुरतीच मर्यादित आहे.

**चलित भाषा** :–कलकत्त्याच्या मौखिक भाषेवर आधारलेल्या भाषेला चलित भाषा असे म्हणतात. सध्या साहित्यिक भाषा म्हणून ह्या भाषेलाच मान आहे. हिच्यात संस्कृत शब्दांचा वापर कमी करून, तद्भव, देशी व विदेशी शब्दांचा वापर फार करतात. साधु भाषेतील सर्वनामांच्या व क्रियापदांच्या रूपांत थोडाफार फेरफार करून चलित भाषेतील सर्वनामांची व क्रियापदांची रूपे तयार होतात. क्वचित् नामांतही फेरफार करतात. चलित भाषेच्या वापरांत गुंतागुंत फार आहे.

साधुभाषेत गंभीरता आहे, अभिजात सौंदर्य आहे. चलित भाषेत त्याचा अभाव आहे. परंतु चलित भाषेत जी गतिमानता आहे ती साधु भाषेत नाही. साधु भाषा पोक्त व्यक्तिप्रमाणे वाटते तर चलित भाषा अल्लड बालिकेप्रमाणे वाटते. चलित भाषेत काही भाव अशा रीतीने व्यक्त करता येतात कीं ते साधुभाषेत व्यक्त करता येत नाहीत. नाटकात व गोष्टीत साधु भाषेतील बोलणे अगदी कृत्रिम वाटते तर चलित भाषेतील बोलणे अगदी स्वाभाविक वाटते.

## बंगाली भाषेची वैशिष्ट्ये

बंगाली भाषेत संस्कृत शब्दांचे प्राचुर्य असले तरी त्या शब्दांचे उच्चार मात्र आपण करतो तसे बंगालीत करीत नाहीत. उच्चारांच्या बाबतीत बंगालीचे वेगळेपण खास जाणवते. केवळ बंगालीतील संस्कृत शब्दांचेच उच्चारण वेगळ्या पद्धतीने करतात असे नव्हे तर संस्कृत वाचतानासुद्धा (बंगाली लिपीत लिहिले जात असल्यामुळे) ते बंगाली पद्धतीनेच वाचतात. 'अमृतं तु विद्या' हे बंगालीत **'অমৃতং তু বিদ্যা'** असे लिहिले जाऊन 'ओम्रितोङ् तु बिद्दा' असे उच्चारले जाते. लिहिताना शब्द संस्कृतप्रमाणे लिहावयाचा परंतु उच्चार मात्र बंगाली पद्धतीने करावयाचा ह्या द्वैतामुळे नवशिक्यास बंगाली भाषेतील छापलेले वाक्य समजले तरी तेच वाक्य उच्चारले असता समजत नाही.

बंगाली भाषेत नामांची व सर्वनामांची रूपे, तसेच क्रियापदांची रूपे ह्यांखेरीज फारच थोडे व्याकरण आहे. बंगाली व्याकरणात ह्याखेरीज इतर विषय जे येतात ती केवळ संस्कृत व इंग्रजी व्याकरणाची उसनवारी होय. नामांना व सर्वनामांना लागणारे विभक्ति-प्रत्यय, ते विभक्ति-प्रत्यय लागून रूपे कशी तयार होतात, तसेच धातूंना निरनिराळ्या काळी लागणारे प्रत्यय व ते लागून क्रियापदाची रूपे कशी तयार होतात एवढी माहिती झाली की लेखी बंगाली भाषा (विशेषत: साधु भाषा) समजण्यास अडचण पडत नाही. शब्दाचे लिंग जरी ठाऊक नसले तरी योग्य तो विभक्तिप्रत्यय वापरल्यास शब्दरूपात चूक होत नाही. त्याचप्रमाणे क्रियापदांची रूपे, लिंग व वचनाप्रमाणे न बदलता केवळ पुरुषांप्रमाणे बदलत असल्यामुळे प्रत्येक काळाची केवळ सहा रूपे ठाऊक असली की काम भागते. ह्यामुळे पुष्कळदा उल्लेखिलेली व्यक्ति स्त्री आहे की पुरुष आहे हे केवळ संदर्भावरून जाणावे लागते. ह्याच पुस्तकात भाषांतराकरिता उतारे ह्या भागात बंकिमचंद्राचा जो उतारा दिला आहे त्यात 'कुंद' नांवाची व्यक्ति स्त्री आहे की पुरुष हे केवळ एका विशेषणांवरून (**ধুল্য বলুণ্ঠিতা**; धुल्यवलुण्ठिता) व तेसुद्धा बंकिमचंद्रांची भाषा संस्कृत-प्रचुर असल्यामुळे समजते. तिथे जर बंगाली विशेषण वापरले गेले असते तर अख्खा उतारा वाचूनसुद्धा त्याचा पत्ता लागला नसता.

बंगाली भाषेत विशेष आंखीव [**ধরাবাঁধা** (धराबांधा), **বাঁধাধরা** (बांधाधरा), **বাঁধাবাঁধি** (बांधाबांधि)] असे नियम नाहीत. त्यामुळे घोकंपट्टीला वाव मुळीच नाही, असे म्हटल्यास ते गैर होणार नाही. परंतु आखीव नियम नसल्यामुळे शब्दांच्या वापराकडे विशेष लक्ष द्यावे लागते. एकच शब्द निरनिराळ्या अर्थी वापरला जातो ह्याची कल्पना खालील उदाहरणांवरून येईल.

১) হইতে (हइते)

(অ) গাছ <u>হইতে</u> ফল পড়িল।

गाछ हइते फल पड़िल।

झाडावरून फळ पडले.

(হইতে--विभक्तिसूचक अव्यय)

(আ) আমি বড় <u>হইতে</u> এখানে আসিয়াছি।
आमि बड़ हइते एखाने आसियाछि।
मोठा होण्याकरिता मी येथे आलो आहे.
(হইতে–असमापिका क्रिया)

(ই) পড়াশুনা করিলে তুমি বড় <u>হইতে</u>।
पड़ाशुना करिले तुमि बड़ हइते।
अभ्यास केला असतास तर तू मोठा झाला असतास.
(হইতে–रीतीभुतकाळी क्रियापद)

(ঈ) রাম <u>হইতে</u> শ্যাম ভাল।
राम हइते श्याम भाल।
रामपेक्षा श्याम चांगला आहे.
(হইতে–दोन वस्तूतील तुलना व्यक्त करताना वापरण्यात येणारे तुलनादर्शक किंवा तर वाचक अव्यय)

(উ) কাল <u>হইতে</u> তুমি এই কাজ করিবে।
काल हइते तुमि एइ काज करिबे।
उद्यापासून तू हे काम करावेस.
(হইতে-अव्यय)

২) নাই (नाइ)

(অ) <u>নাই</u> মামার চেয়ে কানা মামা ভাল।
नाइ मामार चेये काना मामा भाल।
मामा नसण्यापेक्षा आंधळा मामा चांगला.
(নাই–विशेषण)

(আ) তিনি এখানে <u>নাই</u>।
तिनि एखाने नाइ।
ते येथे नाहीत
(নাই–क्रियापद)

(ই) আমি কিছুই করি নাই।
আमि किछुई करि नाइ।
मी कांहींही केले नाहीं.
(নাই–अव्यय)

७) রাম (राम)

(অ) मराठीप्रमाणेच श्रीरामचंद्र असा अर्थ होतो.

(আ) शब्दारंभी आल्यास 'রাম' चा आकाराने मोठा असा अर्थ होतो. उदा. রাম ছাগল (राम छागल)–मोठ्या आकाराचा बकरा. রামধনু (रामधनु)-इंद्रधनुष्य

(ই) शब्दाच्या शेवटी आल्यास श्रेष्ठ (व्यंग्यार्थी) असा अर्थ होतो. उदा. বোকারাম (बोकाराम)–मूर्खशिरोमणी.

(ঈ) तिरस्कार व्यक्तविण्याच्या वेळी 'রাম' चा अव्ययाप्रमाणे उपयोग होतो. उदा. রাম বল। (राम बल)

बंगाली मौखिक भाषेत विशेष कडक अशी দারুণ (दारुण), ভীষণ (भीषण) इत्यादि विशेषणे अगदी साध्या व सरळ अर्थानें वापरतात. मराठीतल्याप्रमाणे त्यांचा 'भयंकर' असा अर्थ न करता 'फारच' असा अर्थ करावा.

उदा. (১) আজ দারুণ গরম হচ্ছে।
आज दारुण गरम हच्छे।
आज फारच उकडत आहे.

(२) মেয়েটি ভীষণ সুন্দরী।
मेयेटि भीषण सुन्दरी।
ती मुलगी फारच सुंदर आहे.

प्रस्तावनेत बंगाली भाषा कां शिकावी, बंगाली भाषेची व तिच्या लिपीची उत्पत्ती कशी झाली, बांगला हे नांव तिला कसे पडले, बंगाली भाषेचा शब्दसंभार, बंगाली भाषेचे प्रकार व तिची वैशिष्टे ह्यांबद्दलची माहिती दिल्यावर ह्याच्या पुढील 'विषयप्रवेश' ह्या सदराखाली ह्या पुस्तकाचा कशा रीतीने उपयोग केल्यास बंगाली भाषा लवकर व उत्तम रीतीने शिकता येईल ते दिले आहे. तेव्हा विषयप्रवेश वाचूनच मग पुस्तकाचा अभ्यास करण्यास सुरवात करावी.

# विषयप्रवेश

प्रौढ व शिक्षित मराठी भाषिकास सहजगत्या बंगाली भाषा बोलायला यावी, त्या भाषेतील लिखित साहित्य (वृत्तपत्रे, मासिके वगैरे) वाचता यावे आणि त्या भाषेत व्यवहारापुरते लिहिताही यावे असा महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळाच्या आंतर-भारती मालेतील बंगाली भाषा प्रवेशाचा उद्देश आहे. या उद्देशास अनुसरून बंगाली भाषेचा सर्वांगीण परिचय करून द्यावयाचा ह्या पुस्तकात प्रयत्न करण्यात आला आहे. पुस्तकाचे तीन भाग करण्यात आलेले आहेत. पहिल्या भागात बंगाली भाषेच्या लिपीची व उच्चारण पध्दतीची (जोडाक्षरांसह) माहिती देण्यात आली आहे. दुसऱ्या भागात बंगाली भाषेच्या व्याकरणाची संपूर्ण माहिती भाषांतर व पत्रलेखन आलेली आहेत, तर तिसऱ्या भागात व्यवहारोपयोगी शब्द-संग्रह दिलेला आहे. पहिल्या दोन भागांचा नीट काळजीपूर्वक अभ्यास केल्यास बंगाली भाषा समजण्यास व लिहिण्यास कोण-तीही अडचण येणार नाही असे म्हटल्यास ते योग्यच ठरेल असा विश्वास वाटतो.

## पुस्तकाचा अभ्यास करण्याची रीत

बंगाली भाषा शिकताना लिपि व उच्चार ह्या अडचणी सर्वप्रथम येतात. बंगाली भाषेत शब्द लिहावयाचा एका तऱ्हेने व त्याचा उच्चार करावयाचा दुसऱ्या तऱ्हेने (आपल्या दृष्टीने) अशी पध्दत आहे. उच्चार शक्यतो कोमल व श्रुतिमधुर (कानास गोड) करण्याच्या बंगाली लोकांच्या प्रवृत्तीमुळे त्यांनी हे द्वैत पत्करले आहे. त्यामुळे बंगाली भाषेला गोडी पण आलेली आहे. विश्व-कवी रवींद्रनाथ ठाकुरांच्या 'गीतांजली'तील कवितेच्या खाली दिलेल्या दोन कडव्यांवरून ह्यांची कल्पना येईल.

| बंगाली लिपि | देवनागरी लिपि |
|---|---|
| অন্তর মম বিকশিত করো | अंतर मम विकशित करो |
| অন্তরতর হে। | अन्तरतर हे। |
| নির্মল করো উজ্জ্বল করো, | निर्मल करो, उज्वल करो, |
| সুন্দর করো হে ॥ | सुन्दर करो हे ॥१॥ |

| | |
|---|---|
| জাগ্রত করো, উদ্যত করো, | जाग्रत करो, उद्यत करो, |
| নির্ভয় করো হে। | निर्भय करो हे। |
| মঙ্গল করো, নিরলস | मङ्गल करो निरलस निःसंशय |
| নিঃসংশয় করো হে। | करो हे। |
| অন্তর মম বিকশিত করো | अंतर मम विकशित करो |
| অন্তরতর হে। | अन्तरतर हे ॥ २॥ |

बंगाली उच्चारात ही दोन कडवी पुढीलप्रमाणे लिहिता येतील.

ऑन्तोरो मॉमो बिकोशितो कॉरो,
ऑन्तोरोतॉरो हे।
निर्मॉलो कॉरो, उज्जॉलो कॉरो
शुन्दॉरो कॉरो हे ॥ १ ॥
जाग्रोतो कॉरो, उद्दॉतो कॉरो,
निर्भॉयो कॉरो हे।
मॉङ्गॉलो कॉरो, निरॉलॉशो निशशॉङ् शॉयो
कॉरो हे।
आन्तोरो मॉमो बिकोशितो कॉरो
ऑन्तोरोतॉरो हे ॥ २ ॥

वरील दोन कडवी देवनागरी लिपीत लिहिल्याप्रमाणे वाचल्यास बंगाली भाषेचा गंधही नसताना कोणलाही अर्थ सहज समजेल; परंतु तीच बंगाली उच्चारात लिहिल्याप्रमाणे वाचल्यास फारसा अर्थबोध न होता केवळ परिचित शब्दांचे विकृत उच्चारण केल्यासारखे वाटेल. बंगाली लिपीत लिहिले असता अर्थातच काहीच वाचता येणार नाही.

ह्या मुख्य अडचणी दूर करण्याकरिता पहिल्या भागात सुरवातीलाच लिपि-परिचय करून दिला असून नंतर उच्चारण पद्धतीची माहिती दिलेली आहे. (उच्चारण पध्दतीचा पाठ सुरवातीला न वाचता त्याचा संदर्भ म्हणून उपयोग करावा.) केवळ लिपीची माहिती करून घेण्यापेक्षा सोपे सोपे शब्द लिहिण्याचा व वाचण्याचा सराव केल्यास बरे पडते. ह्या दृष्टीने पाठ तीन मध्ये निरनिराळे शब्द दिलेले आहेत व त्यांच्या बाजूला त्यांचे उच्चार दिलेले

आहेत. ते शब्द लिहावे व त्याप्रमाणे उच्चार करावा. उच्चारामध्ये एखादी शंका आल्यास पाठ दोनचा संदर्भ म्हणून उपयोग करावा. बंगालीतील जोडाक्षरे जरा क्लिष्ट असल्यामुळे त्यांचा नीट अभ्यास करणे भाग पडते. ह्या दृष्टीने पाठ चार, पांच व सहा हे लिहिलेले आहेत. जोडाक्षरांच्या वेळी पण उच्चारण वेगवेगळ्या तऱ्हेनें होत असल्यामुळे जोडाक्षरयुक्त शब्दांच्या बाजूला त्यांचे उच्चार दिलेले आहेत. हे जोडाक्षरयुक्त शब्द लिहावे व त्यांचा दिलेल्या उच्चाराप्रमाणे उच्चार करावा. याही वेळी एखादी शंका आल्यास पाठ दोनचा संदर्भ म्हणून उपयोग करावा. पाठ तीन ते सहा मध्ये केवळ वाचण्याची संवय व्हावी ह्या हेतुनेच वाक्ये देण्यात आली आहेत. त्यांचा अर्थही जरी खाली देण्यात आला आहे तरी नामांची व सर्वनामांची रूपे, तसेच विभिन्न काळातील क्रियापदांची रूपे ह्यांचा अभ्यास होईपर्यंत तिकडे विशेष लक्ष देऊ नये. इंग्रजी शब्द आपण जसा उच्चार करतो तसाच मराठीत लिहितो, परंतु बंगालीत उच्चारण थोडे विकृत होत असल्यामुळे इंग्रजी शब्द बंगालीत वेगळ्या पद्धतीने लिहिले जातात. तिची कल्पना सातव्या पाठात करून देण्यात आलेली आहे. प्रत्येक पाठात अभ्यास दिलेले आहेत ते सोडवावे. एवढा अभ्यास झाला की कोणताही शब्द बंगाली लिपीत कसा लिहावा व कोणत्याही बंगाली शब्दाचा उच्चार कसा करावा ह्याचे पूर्ण ज्ञान होईल.

यानंतर

यद्यपि बहु नाधीषे तथाऽपि पठ पुत्र, व्याकरणम् ।
स्वजनः श्वजनो मा भूत्सकलं शकलं सकृच्छकृत् ॥

ह्या सुभाषितानुसार बंगाली भाषेच्या व्याकरणाला सुरवात करावी. दुसऱ्या भागांतील पहिला व दुसरा हे पाठ नुसते वाचून काढावेत. ह्यांत मराठी भाषिकांना नवीन किंवा न समजण्यासारखे असे काहीही नाही. तिसऱ्या पाठात कारक व विभक्ति ह्यांची माहिती व चौथ्या पाठात नामांची व सर्वनामांची रूपे दिलेली आहेत. विभक्ति प्रत्यय लक्षात ठेवल्यास ही रूपे सहजच समजतील. संस्कृतप्रमाणे नामांची व सर्वनामांची रूपे पाठ करण्याची मुळीच आवश्यकता नाही. पाचव्या पाठात बंगालीतील साधुभाषा व चलित भाषा ह्यांविषयी माहिती देण्यात आली आहे. केवळ नामांमध्ये व सर्वनामांमध्ये

होणारा फरक येथे दाखविला असून क्रियापदांच्या रूपात होणारा फरक त्या त्या काळातील साधुभाषेतील रूपांबरोबरच दाखविण्यात आला आहे.

सहाव्या पाठापासून काळांना सुरवात झाली आहे. ह्या पाठांत बंगाली-तील 'मौलिक काळां'ची (*Original tenses*) निरनिराळ्या धातूंची रूपे देण्यात आली आहेत. त्याचबरोबर त्या त्या काळातील वाक्ये भाषांतरासह दिलेली आहेत. ह्या पाठापासून बंगाली भाषेच्या व्याकरणशुद्ध अभ्यासाला पद्धतशीर सुरवात करावी. जिथे जिथे अडचण पडेल तिथे तिथे मागील पाठांचा संदर्भ म्हणून उपयोग करावा. अभ्यासाकरिता दिलेल्या मराठी वाक्यांचा बंगालीत अनुवाद करण्याचा प्रयत्न करावा. प्रथम जड जात असल्यास सर्व काळांचा नीट अभ्यास झाल्यावर अनुवाद करण्यास सुरवात करावी. सातव्या पाठात 'असमापिका क्रिया' दिलेल्या आहेत. त्यांची रूपे समजणे मुळीच कठीण जाणार नाही व ही रूपे समजल्यावर आठव्या पाठात दिलेल्या 'यौगिक काळां'ची (*Compound tenses*) रूपे समजण्यात मुळीच अडचण येणार नाही. नवव्या पाठांत बंगालीतील अर्थांची (*Moods*) माहिती देऊन 'अनुज्ञा'ची (*Imperative Mood*) रूपे देण्यात आली आहेत. दहाव्या पाठांत क्रियावाचक नामे, औचित्यार्थक, प्रश्नार्थक व नकारार्थक वाक्ये दिलेली आहेत.

एवढा अभ्यास झाल्यास बंगाली भाषेचे प्राथमिक व अत्यावश्यक ज्ञान झाले असे म्हणता येईल. भाषेच्या वापराच्या दृष्टीने काळांचा वापर, निर्देशक व अनिर्देशक प्रत्यय, विभक्ति प्रत्ययांचा वापर ह्याकडे विशेष लक्ष द्यावे लागते. ह्या दृष्टीने पाठ अकरा, बारा व तेरा लिहिले आहेत. चौदाव्या पाठात विशे-षणांचा तर–तम भाव व पंधराव्या पाठांत धातूंचे प्रकार व त्यांचा वापर कसा करतात ते दाखविले आहे. सोळाव्या पाठांत अव्ययांचा वापर कसा करतात हे दाखविले आहे. ह्या पाठाच्या शेवटच्या भागात अव्ययांचा वापर केलेली निरनिराळी वाक्ये दिलेली आहेत, ती फारच उपयुक्त ठरतील. सतराव्या पाठात एकाच शब्दाचे निरनिराळे अर्थ कसे होतात हे दाखविण्याकरिता काही नामे, विशेषणे व क्रियापदे घेऊन त्यांची निरनिराळ्या अर्थी वेगवेगळी वाक्ये दिली आहेत. अठराव्या पाठात जे काळ दिलेले आहेत त्यांचे मराठीत शब्दशः

भाषांतर नीट करता येत नाही परंतु बंगालीत ते काळ कसे वापरले जातात हे समजण्याकरिता त्यांची रूपे व त्या काळांची वाक्ये दिली आहेत. त्याच पाठाच्या "इतर काळ व बंगालीतील विविध रचनांची वाक्ये" ह्या सदराखाली काही वाक्ये भाषांतरासह दिली आहेत. काही वाक्यांचे मराठीतून बंगालीत शब्दशः भाषांतर करणे अवघड जाते, त्याकरिता तशीही काही बंगाली वाक्ये दिली आहेत.

प्रयोग व प्रत्यक्ष-परोक्ष कथन ह्यांची माहिती अभ्यासूला आवश्यक आहे. ह्या दृष्टीने एकोणीसावा पाठ लिहिला आहे. ह्या नंतर विसाव्या पाठात बंगाली वाक्यरचनेची माहिती दिली आहे. ती बंगालीतून मराठीत व मराठीतून बंगालीत भाषांतर करताना उपयुक्त ठरेल. विरामचिह्नांची आवश्यकता प्रत्येक भाषेत असल्यामुळे एकविसाव्या पाठांत त्यांची माहिती दिली आहे. संधि 'ण'त्व व 'ष'त्व तसेच समास हे कोणत्याही भारतीय भाषेच्या व्याकरणातील आवश्यक भाग असतात. बंगालीही त्याला अपवाद नाही. बावीस, तेवीस व चोवीस हे पाठ ह्या दृष्टीने लिहिले आहेत. विशेष अभ्यास करणारानी त्याच अभ्यास करावा. शब्द-प्रकरणाचा पंचविसावा पाठ बंगाली भाषेच्या अभ्या-साच्याच्या दृष्टीने मनोरंजक व उपयुक्त ठरेल. ह्या पाठात बंगालीत शब्द कोणत्या भाषांतून घेतले आहेत, द्विरुक्त शब्द, ध्वन्यात्मक शब्द, कृत् व तद्धित प्रत्ययामुळे शब्द कसे तयार होतात व त्यांचा अर्थ कसा होतो वगैरे सविस्तर दिलेले आहे. ह्या पाठाचा नीट अभ्यास न केल्यास बंगालीचा अभ्यास पूरा झाला नाही असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही.

कोणत्याही भाषिक लोकांच्या ज्ञानाचा साठा त्यांच्या भाषेतील विशिष्टा-र्थक शब्दात, वाक्प्रचारात व म्हणीत दिसून येत असल्यामुळे बंगालीतील विशिष्टार्थक शब्द, वाक्प्रचार व म्हणी सव्वीसाव्या पाठात देण्यात आल्या आहेत. सत्तावीसाव्या पाठात व्यवहारोपयोगी वाक्ये निरनिराळ्या सदरात दिलेली आहेत. भाषांतराचे नमुने व भाषांतराकरिता काही उतारे अठ्ठाविसाव्या पाठात दिले आहेत. प्रत्येक भाषेतील पत्रलेखनाची पद्धत (मजकूर वगळता) वेगळी-वेगळी असते. बंगालीतील पत्रलेखनाची पद्धत नीट समजण्याकरिता एकोणती-सावा पाठ लिहिला आहे.

वर दर्शविल्या पद्धतीने ह्या पुस्तकाचा अभ्यास केल्यास बंगाली भाषा कोणाच्याही मदतीशिवाय सहज शिकता येईल. बंगाली उच्चारांचा व दुसऱ्या भागातील दहाव्या पाठापर्यंतचा अभ्यास नीट झाल्यावर बंगाली लोकांच्या सहवासाची जोड मिळाल्यास बंगाली भाषेत प्रगति करणे सोपे जाईल. ते जमण्यासारखे नसल्यास बंगाली सिनेमा व नाटके पहावीत, कलकत्ता नभो-वाणीवरील कार्यक्रम ऐकावेत, त्यानेही चांगलाच फायदा होईल.

# पाठ १ ला : अक्षर परिचय

## অক্ষয় পরিচয়

(ओक्खोर् पोरिचॉय्)

१

| স্বরবর্ণ (बंगाली अक्षर) | स्वरवर्ण (सर्वसाधारण उच्चार) | श्शॉर् बॉर्नो (देवनागरी अक्षर) |
|---|---|---|
| অ | ऑ | अ |
| আ | आ | आ |
| ই | इ | इ |
| ঈ | इ | ई |
| উ | उ | उ |
| ঊ | उ | ऊ |
| ঋ | रि | ऋ |
| ঌ | लि | ऌ |
| এ | ए | ए |
| ঐ | ओइ | ऐ |
| ও | ओ | ओ |
| ঔ | ओउ | औ |

टीपा :–(१) ঋ, ৯, এ, ঐ, ও, ঔ, ह्या स्वरांवर रेघ नाही. 'এ' व 'ও' वर रेघ दिल्यास अनुक्रमे ত্র=त्र व ত্ত=त्त ही जोडाक्षरे होतात. शब्दावरील रेघेस मात्रा (মাত্রা) असे म्हणतात.

(२) ৯ हे अक्षर सध्या स्वर म्हणून वापरत नाहीत; ९ ही संख्या दर्शविण्याकरिता वापरतात.

(३) ঋৃ व ৡ हे दोन स्वर अनुक्रमे ॠ व ॡ असे आहेत. परंतु सध्या ते प्रचारांत नसल्यामुळे स्वरवर्णामध्ये दिलेले नाहीत.

(४) कल्कत्ता विश्वविद्यालयाच्या नवीन नियमानुसार 'অ্যা' ला द्वितीय स्वरवर्ण मानतात. साधारणतः इंग्रजी शब्दातील सुरवातीच्या 'a' चा जेव्हा 'ॲ' असा उच्चार होतो त्यावेळेला वापर करतात. जसे :–
অ্যাসিড (Acid); অ্যালিউমিনিয়ম (Aluminium)
অ্যাঁ (केवलप्रयोगी अव्यय; मराठीत आं ह्या अर्थी)

## अभ्यास (१)

पुढील स्वर वर्ण ओळखा

| | | | |
|---|---|---|---|
| ঔ | অ | ই | ঐ |
| ঋ | এ | ও | উ |
| ঈ | ৯ | ঊ | আ |

## २

| ব্যঞ্জনবর্ণ (बंगाली अक्षर) | व्यंजन वर्ण (सर्वसाधारण उच्चार) | ब्यान्‌जोन् बॉर्नो (देवनागरी अक्षर) |
|---|---|---|
| ক | कॉ | क |
| খ | खॉ | ख |
| গ | गॉ | ग |
| ঘ | घॉ | घ |
| ঙ | ङॉ | ङ |

| ব্যঞ্জনবর্ণ (बंगाली अक्षर) | व्यंजन वर्ण (सर्वसाधारण उच्चार) | | ब्यान्जोन् बॉर्नो (देवनागरी अक्षर) |
|---|---|---|---|
| চ | चॉ | मृदु उच्चार | च |
| ছ | छॉ | | छ |
| জ (বর্গীয়) | जॉ (बोर्गिओ) | | ज (वर्गीय) |
| ঝ | झॉ | | झ |
| ঞ | ञॉ | | ञ |
| ট | टॉ | | ट |
| ঠ | ठॉ | | ठ |
| ড | डॉ | | ड |
| ঢ | ढॉ | | ढ |
| ণ | नॉ | | ण |
| ত | तॉ | | त |
| থ | थॉ | | थ |
| দ | दॉ | | द |
| ধ | धॉ | | ध |
| ন | नॉ | | न |
| প | पॉ | | प |
| ফ | फॉ | | फ |

| ব্যঞ্জনবর্ণ<br>बंगाली अक्षर | व्यंजन वर्ण<br>(सर्वसाधारण उच्चार) | ब्यान्‌जोन्‌ बॉर्नो<br>(देवनागरी अक्षर) |
| --- | --- | --- |
| ব | बॉ | ब |
| ভ | भॉ | भ |
| ম | मॉ | म |
| য (অন্তস্থ) | जॉ (आन्‌तोस्थो) | य (ज अंतस्थ) |
| র | रॉ | र |
| ল | लॉ | ल |
| ব | बॉ | व |
| শ | शॉ | श |
| ষ | शॉ | ष |
| স | शॉ | स |
| হ | हॉ | ह |
| ড় | 'ड' व 'ऱ' ह्यांच्या मधला ऑकार 'ड़्ह' असा मिश्र ऑकार — हे दोन्ही उच्चार मराठीत नाहीत | ड़ |
| ঢ় | | ढ़ |
| য় | यॉ | य |
| ৎ (খণ্ড'ত') | त्‌ (खॉण्डो'तॉ) | त्‌ |
| ং | | अनुस्वार |
| ঃ | | विसर्ग |
| ঁ | | चंद्रबिंदु |

टीपा :-(१) খ, গ, ঙ, ঞ, ণ, থ, প, শ पैकी काही अक्षरावर रेष (মাত্রা-मात्रा) नाही तर काही अक्षरापुढे लिहिण्याच्या व टाईपच्या सोईकरिता रेष आहे. 'ত' ह्या अक्षरावर रेष न दिल्यास ৩ ही संख्या होते.

(२) 'ळ' हे अक्षर बंगालीत नाही. मराठीतील 'ळ' बद्दल बंगालीत 'ল' लिहितात.

उदा. गोपाळ (গোপাল) बाळकराम (বালকরাম)

'क्ष' व 'ज्ञ' ही अक्षरे अनुक्रमे क् + ष व ज् + ञ ह्यांची जोडाक्षरे समजली जातात व ক্ষ (क्ख) व জ্ঞ (ग्यं) अशी लिहिली जातात.

(३) 'व' ह्या मूळाक्षराचा बंगालीत सर्वत्र 'ब' असाच उच्चार करतात. स्वतंत्र 'व' असा उच्चार करीत नाहीत.

(४) शब्दाच्या शेवटी मराठीत 'त्' आल्यास त्या ठिकाणी बंगालीत 'ৎ' हे अक्षर वापरतात.

उदा. जगत् (জগৎ), सत् (সৎ), महत् (মহৎ)

'त्' पुढे स्वर किंवा व्यंजन आल्यास संधिनियमाप्रमाणे संधि होतो.

उदा. জগৎ + ঈশ = জগদীশ

সৎ + চরিত্র = সচ্চরিত্র

(५) मराठीत 'ज' हे अक्षर असते तेव्हा बंगालीत 'জ' ( वर्गीय ज ) वापरतात.

उदा. जखम (জখম), जटिल (জটিল),

जठर (জঠর), जीवाणु (জীবাণু)

मराठीत शब्दाच्या सुरवातीला जेव्हा 'य' हे अक्षर असते तेव्हा बंगालीत 'য' (अन्तस्थ ज) वापरतात.

उदा. यथा (যথা), यवन (যবন), यम (যম), यश (যশ)

मराठीत 'य' हे अक्षर शब्दाच्या मध्ये असते तेव्हा बंगालीत काही अपवाद वगळल्यास 'য়' हे अक्षर वापरतात. शब्दाच्या शेवटी 'य' असल्यास बंगालीत नेहमी 'য়' हेच अक्षर वापरतात.

उदा. समय (সময়), जय (জয়), पलायन (পলায়ন), शयन (শয়ন)

मराठीत अ, नि, वि, सु, सं इत्यादि उपसर्गांच्या पुढे 'य' अक्षर असते तेव्हां बंगालीत 'য' ( अन्तस्थ ज ) वापरतात.

उदा. अयुग्म (অযুগ্ম), नियुक्त (নিযুক্ত), वियुक्त (বিযুক্ত), सुयोग (সুযোগ), संयोग (সংযোগ), अपवाद वियोग (বিয়োগ)

(६) अनुस्वार व विसर्ग बंगालीत अक्षरापुढे लिहितात.

उदा. সিংহ (शिङ्हो), সংশয় (शॉङ्शोय) দুঃখ (दुक्खो), নিঃশেষ (निश्शेश्)

काही ठिकाणचे अनुस्वार लिहिण्यात बंगालीत थोडा फरक आहे तो असा मराठीत बहुतेक अक्षरांच्या डोक्यावर टिंब देतात; पण बंगालीत (संस्कृतप्रमाणेच) त्याबद्दल बऱ्याच ठिकाणी पुढील वर्णाचे अनुनासिक वापरतात. जसे :

| मराठीत | बंगालीत |
|---|---|
| अंक | অঙ্ক (ओङ्को) |
| संचार | সঞ্চার (शॉन्चार्) |
| विलंब | বিলম্ব (बिलोम्बो) |
| घंटा | ঘণ্টা (घॉण्टा), |
| अनंत | অনন্ত (ऑनोन्तो) |

(७) चंद्रबिंदु अक्षरांच्या डोक्यावर काढतात. जसे :
আঁঠি (आंठि), গোসাঁই (गोशांइ.)

[चंद्रबिंदुसारखेच परंतु उजवीकडची बाजू लांब असलेले असे ৺ चिन्ह बंगालीत आहे. ह्या चिन्हाला 'ঈশ্বর' (इश्शोर ही संज्ञा आहे. हे चिन्ह हिन्दु देवता, मृतव्यक्ति किंवा तीर्थक्षेत्रांच्या नावांच्या अगोदर लिहितात. जसे :

(১) ৺ শ্রীশ্রীদুর্গা (श्रिश्रिदुर्गा)

(২) ৺যদুগোপাল মুখোপাধ্যায় (जोदुगोपाल मुखोपाध्याय)

(৩) ৺বারানসী (बारानोशी)

हल्ली हे चिन्ह चंद्रबिंदुप्रमाणेच (उजवीकडची बाजू लांब न काढता) लिहिण्याचा प्रघात आहे.]

(८) बंगालीत 'ॐ' हा 'ওঁ' किंवा 'ওম্' असा लिहितात.

(९) ঙ, ঞ, ণ, ড়, ঢ়, য়, ৎ ही व्यंजने बंगालीत शब्दारंभी कधीच येत नाहीत. ড় व ঢ় ही व्यंजने शब्दाच्या मध्ये व য় (अन्तस्थ ज) शब्दाच्या

शेवटी कधीच येत नाहीत. ড় हे व्यंजन शब्दाच्या मध्ये किंवा शेवटी येते तर ঢ় हे व्यंजन सर्वसाधारणपणे शब्दाच्या शेवटीच येते.

(१०) पुढील अक्षरांतील फरक लक्षात घ्यावा :

| | |
|---|---|
| ব, র, ক | ড, ড়, উ, ঊ |
| য, য়, য | ঢ, ঢ়, ট |
| খ, থ | ঋ, ঝ |
| ঘ, ধ | ত, অ |
| ণ, ন | ম (लिखी), স |
| হ, ই | |

## अभ्यास (२)

पुढील व्यंजनवर्ण ओळखा

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ব | জ | ম | ঢ | গ | ঞ | ড | ঁ |
| ক | ড় | খ | ল | শ | প | ঙ | ন |
| ৎ | ষ | দ | চ | ঠ | ণ | য | ঝ |
| ধ | ট | থ | ং | হ | ভ | ঃ | র |
| ফ | য় | ছ | ঢ় | ঘ | ত | স | |

## ३

**स्वर :–**

बंगालीत स्वर दोन प्रकारचे आहेत.

(१) ऱ्हस्व ( **হ্রস্ব** — ऱ्हॉशशो )

(२) दीर्घ ( **দীর্ঘ** — दिर्‌घो )

ऱ्हस्व स्वर (**হ্রস্ব স্বর**) :– অ, ই, উ, ঋ, ঌ

दीर्घ स्वर (**দীর্ঘ স্বর**) :– আ, ঈ, ঊ, এ, ঐ, ও, ঔ

**व्यंजन :–**

ক, চ, ট, ত, প ही व्यंजने अकारयुक्त आहेत. [ক্ + অ = ক; চ্ + অ = চ] मूळ व्यंजनवर्णाबरोबर स्वरवर्ण नसल्यास त्या व्यंजन-वर्णाला **'হসন্ত'** ( हॉशोन्तो ) किंवा **'হলন্ত'** ( हॉलोन्तो ) म्हणतात.

**'হসন্ত'** वर्णाच्या शेवटीं ( ् ) हे चिन्ह असते. उदा. ক্, খ্, চ্, ছ্, इत्यादि ( ् ) चिन्हाला **'হসচিহ্ন'** ( हॉशचिन्नो ) म्हणतात.

क् पासून म् पर्यंतच्या पंचवीस व्यंजनवर्णांना स्पर्श वर्ण **স্পর্শবর্ণ** (स्पॉर्शो बॉर्नो ) म्हणतात. त्यांचे पांच भाग पडतात. प्रत्येकाला वर्ग **বর্গ**–(बॉर्गो) म्हणतात.

| | |
|---|---|
| ক্, খ্, গ্, ঘ্, ঙ্, | क - वर्ग **(ক-বর্গ)** |
| চ্, ছ্, জ্, ঝ্, ঞ্ | च - वर्ग **(চ-বর্গ)** |
| ট্, ঠ্, ড্, ঢ্, ণ্ | ट - वर्ग **(ট-বর্গ)** |
| ত্, থ্, দ্, ধ্, ন্ | त - वर्ग **(ত-বর্গ)** |
| প্, ফ্, ব্, ভ্, ম্ | प - वर्ग **(প-বর্গ)** |
| য্, র্, ল্, ব্ | अंतस्थ वर्ण **(অন্তস্থ বর্ণ)** –(ऑन्तोस्थो बॉर्नो) |
| শ্, ষ্, স্, হ্ | उष्मवर्ण **(উষ্মবর্ণ)**-(उशमो बॉर्नो) |

उच्चारण स्थानानुसार स्वरवर्ण व व्यंजनवर्ण ह्यांचे पुढीलप्रमाणे भाग पडतात.

| স্বরবর্ণ | ব্যঞ্জনবর্ণ | **নাম** ( नाम् - नांव ) |
|---|---|---|
| অ, আ | ক-বর্গ, হ্, | **কণ্ঠ্য** ( कोण्ठो-कण्ठ्य ) |
| ই, ঈ | চ-বর্গ, য্, শ্, | **তালব্য** ( तालोब्बो-तालव्य ) |
| ঋ | ট-বর্গ, র্, ষ্, | **মূর্ধন্য** ( मुर्धोननो-मूर्धन्य ) |
| ৯ | ত-বর্গ, ল্, স্ | **দন্ত্য** ( दोन्तो-दन्त्य ) |
| উ, ঊ | প-বর্গ | **ওষ্ঠ্য** ( ओश्ठो-ओष्ठ्य ) |
| এ, ঐ | ×× | **কণ্ঠতালব্য** ( कोण्ठोतालोब्बो-कण्ठ्यतालव्य ) |
| ও, ঔ | ×× | **কণ্ঠোষ্ঠ্য** (कोण्ठोउश्ठो-कण्ठ्यौष्ठ्य) |
| | অন্তস্থ ব্ | **দন্ত্যোষ্ঠ্য** ( दोनतोउश्ठो-दन्त्यौष्ठ्य ) |

ঙ্, ঞ্, ণ্, ন্, ম্ नां **'অনুনাসিক বর্ণ'** (ओनुनाशिक् बोर्नो-अनुनासिक वर्ण ) असे पण म्हणतात.

चंद्रबिंदु व ९ अनुस्वारांचा उच्चार नाकांतून होतो म्हणून त्यांना पण **'অনুনাসিক বর্ণ'** म्हणतात.

## बाराखडी

मराठीप्रमाणेच बंगालीत 'অ' खेरीज सर्व स्वरांना वेगवेगळी चिन्हे आहेत—

আ (া), ই (ি), ঈ (ী), উ (ু), ঊ (ূ) ঋ (ৃ), এ (ে), ঐ (ৈ), ও (ো), ঔ (ৌ)

बंगाली ক কা কি কী কু কূ কৃ কে
मराठी क का कि की कु कू कृ के

बंगाली কৈ কো কৌ কং কঃ
मराठी कै को कौ कं कः

ह्याचप्रमाणे इतर बाराखड्या खालीलप्रमाणे काढता येतील.

ত তা তি তী তু তূ (তৃ) তে তৈ তো তৌ তং তঃ
ব বা বি বী বু বূ (বৃ) বে বৈ বো বৌ বং বঃ
ল লা লি লী লু লূ (লৃ) লে লৈ লো লৌ লং লঃ

**टीपः**—व्यंजनवर्णाशी स्वरवर्ण जोडण्याला बंगालीत 'বানান' (बानान्) म्हणतात. कोणत्याही शब्दाचे 'বানান' सांगावयाचे म्हणजे तो शब्द कसा बनला आहे हे दाखवावे लागते.

उदा : যমুনা = য্ + অ + ম্ + উ + ন্ + আ
কলিকাতা = ক্ + অ + ল্ + ই + ক + আ + ত্ + আ

## अभ्यास (३)

पुढील शब्द बंगाली लिपीत लिहा :-

रामायण, भरत, कैकेयी, हनुमान, रावण, बिभीषण, महाभारत, नकुल, सहदेव, बलराम, राधिका, केशव, गोपाल, नारायण, सोमनाथ, शैलजा, नटराज, मोहन, गजानन, शिवाजी, जिजाबाई, नानासाहेब, हेमलता, कुमुदिनी, रमेश, विजयकुमार, भगवानदास, आसाम, बिहार, हिमालय, मधुसूदन, सरोजिनी, राजशेखर.

# पाठ २ रा : उच्चारण

## উচ্চারণ

## (उच्चारोन्)

प्रत्येक भाषेच्या उच्चारामध्ये स्वतःचे असे खास वैशिष्ट्य असते, बंगालीत तर ते विशेषच जाणवते. बंगाली भाषेत शब्द लिहावयाचा एका तऱ्हेने व त्याचा उच्चार करावयाचा दुसऱ्या तऱ्हेने असे द्वैत असल्यामुळे पुस्तकातील छापील वाक्य जरी आपणास समजले तरी तेच वाक्य एखाद्या बंगाली माणसाने उच्चारले तर आपणास समजत नाही. (विषयप्रवेश ह्या सदराखाली दिलेल्या विश्वकवी रवींद्रनाथ ठाकुरांच्या कवितेच्या दोन कडव्यांवरून ह्याची कल्पना आली असेलच.) केवळ उच्चारणाच्या नियमांचा अभ्यास करून शुद्ध उच्चार करता येणे अशक्य आहे. त्याकरिता बंगाली भाषा बोलणाऱ्या समाजातच वावरले पाहिजे. तरीसुद्धा पुस्तकाद्वारे उच्चार समजाविणे जेवढे शक्य आहे, तेवढे समजाविण्याचा येथे प्रयत्न करण्यात आला आहे.

१

### स्वर वर्ण ( স্বরবর্ণ )

অ :–(१) ह्याचा स्वाभाविक उच्चार 'ऑ' असा करतात. [Doll मधील 'O' प्रमाणे]

उदा. অচল (ऑचॉल्, ऑचोल्); কপাল (कॉपाल्); দশ (दाश्)

(२) 'অ' कारापुढील अक्षरामध्ये ই ঈ, উ, ঊ, য-ফলা, জ্ঞ, ক্ষ असेल तर त्याचा ऱ्हस्व 'ओ' सारखा उच्चार होतो. [Home मधील 'O' प्रमाणे]

उदा. অবধি (ऑबोधि); করবী (कॉरोबि); জলুশ (जोलुश्); বধূ (बोधु); পথ্য (पोत्थो); দৈবজ্ঞ (दोइबोग्गो); লক্ষ (लोक्खो)

(३) क्रियापदांच्या शेवटच्या 'অ' चा पुष्कळ वेळा 'ओ' असा उच्चार होतो. उदा. কর (कॉरो); করিল (कोरिलो); করিব (कोरिबो); করিত (कोरितो)

परंतु क्रियापदांच्या शेवटच्या 'ন' व 'ম' मधील 'অ' काराचा उच्चार होत नाही.

उदा. করেন (कॉरेन्); করিলাম (कोरिलाम्); করিবেন (कोरिबेन्); করিতাম (कोरिताम्)

(४) काही 'ণ' किंवा 'ন' कारान्त दोन अक्षरी शब्दांच्या पहिल्या अक्षराच्या अंती 'অ' असेल तर त्याचा 'ऑ' प्रमाणेच 'ओ' असा पण उच्चार होतो.

उदा. মন (मॉन् ,मोन्); বন (बॉन् , बोन्); ধন (धॉन् , धोन्); জন (जॉन् , जोन्) পণ (पॉन् - प्रतिज्ञा ह्या अर्थी; व पोन् -परिमाण व हुंडा ह्या अर्थी)

परंतु पुढील शब्दात 'ऑ' असाच उच्चार होतो.

রণ (रॉन्); গণ (गॉन्); সন (शॉन्)

(५) 'ই' कार किंवा 'এ' कारानंतर 'য়' अक्षर असेल तर त्यामधील 'অ' काराचा 'ओ' असा उच्चार होतो.

उदा. প্রিয় (प्रियो), দেয় (देयो), ধেয় (धेयो)

(६) शब्दाच्या सुरवातीला 'প্র' असल्यास त्यातील 'অ'चा उच्चार 'ओ' असा होतो. (প্র – प्रो)

उदा. প্রভাত (प्रोभात्); প্রণাম (प्रोनाम्); প্রবেশ (प्रोबेश्); প্রলয় (प्रोलोय् , प्रोलॉय)

(७) दोन अक्षरी शब्दाच्या शेवटी 'অ' कार असून त्या अगोदर ঋ, ঐ, ঔ असल्यास शेवटच्या 'অ' काराचा 'ओ' असा उच्चार होतो. उदा. তৃণ (त्रिनो); শৈল (शोइलो); মৌন (मोउनो)

(८) शब्दाच्या शेवटच्या 'অ' काराचा कधी कधी उच्चार होत नाही.

उदा. কাঠ (काठ्); চিল (चिल्); মানব (मानोब्);
সলিল (शोलिल्) ह्या शब्दाबरोबर दुसरा बंगाली शब्द जोडल्याने सुध्दां त्यांच्या अंतिम 'অ' काराचा उच्चार होत नाही.
उदा. কাঠঠোকরা (काठ्ठोकरा) চিলগুলি (चिल्गुलि)
মানবসমাজ (मानोब्शॉमाज्) মনগড়া (मॉन्गोड़ा)
সলিলসমাধি (शोलिल्शोमाधि)

परंतु जोडलेला शब्द जोडाक्षराने आरंभ होणारा असेल तर 'অ' काराचा उच्चार होतो. जोडलेला शब्द संस्कृत असेल तरसुद्धा कधी कधी 'অ'काराचा उच्चार होतो.

उदा নরলোক (नॉरॉलोक्); ফলপ্রদ (फॉलोप्रोद)

(९) तीन अक्षरी शद्बाच्या अंतिम 'অ' काराचा उच्चार होत नसेल तेव्हा प्रायः मधल्या अक्षराच्या 'অ' काराचा 'ओ' असा उच्चार होतो.

उदा. তরল (तॉरोल्); কথন (कॉखोन्); বমন (बामोन्);
লবণ (लाबोन्)

परंतु अंतिम अक्षरात 'অ' काराखेरीज इतर स्वर असल्यास 'অ'कार-युक्त मधल्या अक्षरातील অ चा उच्चार होत नाही.

उदा. চলতি (चोल्ति); শুকনা (शुक्ना); হলদে (हाल्दे);
কায়দা (काय्दा)

अपवाद : বাঁসরি (बांशोरि); জননী (जॉनोनि); জ্ঞানদা (ग्यांनोदा)

(१०) चार अक्षरी शब्दात दुसरे अक्षर 'অ' कारयुक्त असेल तर त्या 'অ' चा उच्चार होत नाही.

उदा. ছারপোকা (छार्पोका); শয়তান (शॉय्तान्);
কুলকুচা (कुलकुचा)

परंतु तत्सम शब्दामध्ये प्राय: दुसऱ्या 'অ' काराचा उच्चार होतो.

उदा. ভগবান (भॉगोबान्); মুখচন্দ্র (मुखचॉन्द्रो);
দেবস্থান (देबोस्थान्)

चार अक्षरी शब्दाचे तिसरे अक्षर 'অ' कारयुक्त असेल तर स्पष्ट उच्चार होतो.

उदा. অভিমত (ओभिमॉतो, ओभिमॉत्); হরিতকী (होरितोकि) গনপতি (गॉनोपोति)

(११) चार अक्षराहून मोठा शब्द असल्यास उच्चाराच्या सोयीसाठी त्याचे साधारणत: दोन दोन अक्षरी भाग पाडतात व त्या भागांच्या शेवटी 'অ' कार असेल तर त्याचा 'ओ' असा उच्चार होतो.

उदा. অনুধাবন (ओनु - धाबो - न्) অনবরত (ऑनो - बॉरो - तो) সমীকরণ (शोमि - कॉरो - न्) ফরমাইশ (फॉरो - माइ - श्)

(१२) शब्दाच्या शेवटी असलेल्या जोडाक्षरांतील व त्याच्या मागील 'অ' काराचा उच्चारणात लोप होत नाही व पुष्कळदा 'ओ' असा उच्चार होतो.

उदा. দন্ত (दॉनतो, दॉन्तॉ); পুষ্প (पुशपो, पुशपॉ); পরব্রহ্ম (पॉरोब्रोम्हॉ); সহস্র (शॉहॉसम्रॉ, शॉहॉस्रो); অরবিন্দ (ऑरोबिन्दो, ऑरोबिन्दॉ)

(१३) शब्दाच्या शेवटी ঢ়, হ, ক্ত, য়, তর, তম, ত্ব, असल्यास अंतिम 'অ' काराचा 'ओ' असा उच्चार होतो व त्याच्या अगोदरच्या 'অ' काराचा पण उच्चार होतो.

उदा. গাঢ় (गाढो); দৃঢ় (द्रिढो); মোহ (मोहो); শক্ত (शॉक्तो); বিধেয় (बिधेयो); গুরুতর (गुरुतॉरो); মৃদুতম (म्रिदुतॉमो); ঈশ্বরত্ব (इशशॉरॉत्तो); মহত্ব (मॉहोत्तो) परंतु বিষয় (बिशोय्)

আশয় (आशोय्) शब्दाच्या शेवटी 'তা' असल्यास त्याच्या अगोदरच्या 'অ' काराचा उच्चार होतो.

उदा. কৃপণতা (क्रिपोनोता); সরলতা (शॉरोलोता).

(१४) संस्कृतमधून बदल न करता घेतलेल्या शब्दांतील (तत्सम शब्दांतील) अंतिम 'অ' काराचा उच्चार होत नाही.

उदा. গগন (गॉगोन). আকাশ (आकाश्), अपवाद :- জিত (जितो), বিবিধ (बिबिधो)

(१५) समासबद्ध शब्दांतील प्रत्येक 'অ' काराचा उच्चार होत नाही.

उदा. ফলফুল (फॉल्फुल्); রাজনীতি (राज़निति); গান-বাজনা (गान्-बाज्ना); তরুন-তরুনী (तोरुन्-तोरुनि).

(१६) अनुस्वाराच्या अगोदरच्या 'অ' काराचा 'ओ' असा उच्चार होतो.

उदा. অহংকার (ऑहोङ्कार); বিসংগত (बिशोङ्-गोतो).

(१७) विसर्गाच्या अगोदरच्या 'অ' चा 'ओ' असा उच्चार होतो व विसर्गा-पुढील अक्षराचे उच्चारण करताना द्वित्व होते.

उदा. অধঃপাত (ऑधोप्पात्) মনঃপূত (मॉनोप् पुतो)

(१८) शब्दाच्या सुरवातीला नकारार्थी 'অ' किंवा 'অন্' तसेच सह किंवा संपूर्ण ह्या अर्थी 'স' किंवा 'সম্' हे उपसर्ग असतात तेव्हा 'অ' चा 'ऑ' असा उच्चार होतो.

उदा. অক্ষম (ऑक्खोम्) অন্যায় (ऑन्नाय्, ऑन्न्याय्); সবিনয় (शॉबिनॉय्); সম্প্রতি (शॉम्प्रोति)

परंतु असे शब्द जर व्यक्तींची नावे असतील तर त्यांच्या आद्य 'অ' काराचा 'ओ' असा उच्चार होतो.

उदा. অতুল (ओतुल्); অমূল্য (ओमुल्लो); অবিনাশ (ओबिनाश्).

(१९) शुद्ध बंगाली शब्दात पुष्कळवेळा अन्त्य 'অ' काराचा 'ओ' असा उच्चार होतो.

(क) विशेषण किंवा विशेषणाप्रमाणे वापरल्या जाणाऱ्या शब्दात :

उदा. ভাল (भालो); বড় (बॉड़ो); ছোট (छोटो); খাট (खाटो); এত (ॲतो); যত (जॉतो); কত (कॉतो); তত (तॉतो); হেন (हॅनो); যেন (जॅनो); কোন (कोनो); মত (मॉतो)

(ख) 'আন' प्रत्ययान्त शब्दात :

उदा. করান (कॉरानो); দেওয়ানো (देवानो); হাতড়ান (हातड़ानो); পাড়ান (पाड़ानो).

(ग) द्विरुक्त विशेषणात व ध्वन्यात्मक शब्दात.

उदा. মর-মর (मॉरो-मॉरो); কাঁদ-কাঁদ (कांदो-कांदो); ঝর-ঝর (झॉरो-झॉरो); ছল-ছল (छॉलो-छॉलो)

(घ) काही संख्यावाचक विशेषणात :

उदा. এগার (एगारो); বার (बारो); তের (तेरो)

(ङ) 'ত' व 'ইত' प्रत्ययान्त विशेषणात :

उदा. পুলকিত (पुलोकितो); গত (गॉतो); নত (नॉतो); রক্ষিত (रोक्खितो)

আ (१) 'আ' चा साधारणतः ऱ्हस्व उच्चार होतो.

उदा. আপন ( आपोन् ); পাতা (पाता); কথা (काथा)

(२) विशेष जोर देण्याकरिता 'আ' चा दीर्घ उच्चार करतात ( Calm मधील 'a' प्रमाणे)

उदा. হাত ( हात ); কাজ (काज्) ; আজ (आज् )

(३) 'না' मधील 'আ' काराचा नेहमी दीर्घ उच्चार होतो. परंतु क्रियापदाबरोबर आल्यास त्याच 'আ' काराचा ऱ्हस्व उच्चार होतो.

उदा. খাব না (खाबो ना)

(४) बंगालमधील काही प्रदेशांत शब्दारंभी असलेल्या 'অ'चे 'অ্যা' किंवा 'এ্যা' असे विकृत उच्चारण होते.

उदा. টাকা (टाका, ट्याका); বাঁকা (बांका, ब्यांका)

ই, ঈ :- (१) दोघांचा साधारणतः ऱ्हस्व उच्चार होतो. [ Tin मधील 'i' प्रमाणे ]

उदा. ইট ( इट् ); দিবস (दिबोश् ); তিনি (तिनि); নদী (नोदि); দীপ ( दिप् ); জীবনী (जिबोनि)

(२) कधी कधी दीर्घ उच्चार पण होतो. [ Feet मधील 'ee' प्रमाणे ]

उदा. দিন ( दीन् ); অসীম ( ऑशीम् ):

(३) जोर देण्याकरिता किंवा वेगळा अर्थ दर्शविण्याकरिता दीर्घ उच्चार करतात.

उदा. তুমি কি স্বপ্ন দেখিতেছ ? (तुमि कि शॉप्नो दॅखितेछो ? - तू कसले स्वप्न पहात आहेस ? ) हा साधारण प्रश्न असून 'কি' वर जोर दिलेला नाही. परंतु তুমি কি স্বপ্ন দেখিতেছ ? (तुमि की शॉप्नो दॅखितेछो ? तूं काय स्वप्न पहात आहेस ?) हा जोर दिलेला प्रश्न आहे. त्यामुळे 'কি' चा दिर्घ उच्चार 'की' असा होतो. पुष्कळवेळा अशा ठिकाणी 'কি' बद्दल 'কী' लिहिण्याचा प्रघात आहे.

উ, ঊ :- (१) दोघांचा साधारणतः ऱ्हस्व उच्चार होतो. [ Put मधील 'u' प्रमाणे. ]

उदा. উচিত ( उचित् ); ঊরু (उरु); তুষার ( तुशार् ); দূর ( दुर् ); তূন ( तुन् )

(२) कधी कधी दीर्घ उच्चार पण होतो. [ Baloon मधील 'oo' प्रमाणे ]

उदा. সুখ ( शूख् ); অমুক ( ओमूक् ); রূপ ( रूप् ); परंतु রূপা (रुपा)

(३) दोन अक्षरी शब्दात 'উ' नंतर 'আ' किंवा उच्चारित 'অ' असेल तर 'উ' चा 'ओ' उच्चार करतात.

उदा. উঠো (ओठो); উড়া (ओड़ा)

ঋ :- साधारणतः 'रि' उच्चार होतो.

ঋজু (रिजु); ঋতু (रितु); কৃপন (क्रिपोन्); নৃপ (न्रिपो); परंतु ঋন (रीन्)

['ঋ' व 'রি' (র্+ই) ह्यांचा उच्चार एकच असल्यामुळे 'ঋ' ला वेगळा स्वरध्वनि नाही. म्हणून संस्कृतखेरीज बंगाली व विदेशी शब्द लिहिताना 'ঋ' चा वापर न करण्याचा प्रघात आहे.

उदा. संस्कृत शब्द :- संस्कृति (সংস্কৃতি); अमृत (অমৃত)
बंगाली व विदेशी शब्द :- ख्रिस्त (খ্রীষ্ট); ख्रिश्चन (খ্রীষ্টান); ब्रिटिश (ব্রিটিশ) ]

ঌ :- ह्या अक्षराचा स्वर म्हणून बंगालीत उपयोग होत नसल्यामुळे त्याचा उच्चार पण नाही.

এ :- (१) शब्दाच्या मध्ये किंवा शेवटी 'এ' कार असल्यास त्याचा 'ए' असा उच्चार होतो. [Set मधील 'e' प्रमाणे]

उदा. ছেলে (छेले); মেয়ে (मेये); নেয়ে (नेये-नेए); চামচিকে (चामचिके)

(२) एकाक्षरी सर्वनामाच्या 'এ' काराचा ए असा उच्चार होतो.

उदा. সে (शे); কে (के); যে (जे); এ (ए)

(३) 'এ' काराच्या पुढले अक्षर অ, ই, ঈ, উ, ঊ कारान्त वा 'হসন্ত' असल्यास त्या 'এ' काराचा (ए) असा उच्चार होतो.

उदा. দেহ (देहो, देहॉ); কেলি (केलि); বেটী (बेटि); সেতু (शेतु); কেয়ুর (केयुर्-केउर्); এন্তার (एन्तार); একটি (एकटि); একটু (एकटु)

अपवाद :- কেমন ( कॅमोन् , क्यामोन् ); কেন (कॅनो, क्यानो); এক ( अॅक ); একটা (अॅक्टा); একদা (अॅकोदा); যেন (जॅनो); গেল (गॅलो)

(४) शब्दाच्या सुरवातीला असलेल्या 'এ' कारापुढे येणाऱ्या अक्षरांत 'আ' कार, ( क्वचित् ) 'এ' कार व 'ও' कार असल्यास किंवा 'এ' कारावर चंद्रबिंदु असल्यास 'এ' काराचा 'এ্যা' किंवा 'অ্যা' असा विकृत् उच्चर होतो. अशा उच्चाराला 'বাঁকা একার' (बांका एकार-वक्र एकार) म्हणतात.

उदा. ভেলা (भॅला, भ्याला); বেচা (बॅचा, ब्याचा); একা (अॅका); দেখা (दॅखा, द्याखा); খেলা (खॅला, ख्याला); শেওলা (श्याओला); পেঁচা (प्यांचा); ছেঁদা (छ्यांदा)

[দেখে (दॅखे, द्याखे); খেলে (खॅले, ख्याले) ही जेव्हा 'দেখা' व 'খেলা' ह्या क्रियापदांची वर्तमानकाळची तृतीय पुरुषाची रूपे असतात तेव्हा त्यांचा कंसांत दाखविल्याप्रमाणे उच्चार करतात. परंतु जेव्हां ही 'দেখিয়া' व 'খেলিয়া' ह्या असमापिका क्रियापदांची चलित भाषेतील रूपे असतात तेव्हा त्यांचा उच्चार 'देखे' व 'खेले' असा करतात. इतर 'এ' काराने सुरू होणाऱ्या क्रियापदाना पण हाच नियम लागतो.]

(५) उदा. कधीकधी एकाच वेळी 'ए' व 'अॅ' असे दोन्ही उच्चार होतात.

उदा. একতা (एकोता, अॅकोता); বেলা (बेला, बॅला, ब्याला)

ঐ :- (१) पश्चिम बंगालमध्ये ह्याचा उच्चार 'ओइ' च्या द्रुत उच्चारा प्रमाणे करतात.

उदा. ঐহিক ( ओइहिक् ); জৈন (जोइनो); নৈতিক ( नोइतिक् ); বৈভব ( बोइभोब् )

पूर्व बंगालमध्ये ह्याचा उच्चार 'ऑइ' च्या द्रुत उच्चाराप्रमाणे करतात.

उदा. ঐহিক ( ऑइहिक् ); নৈতিক ( नॉइतिक् )

(२) ह्याचा खरा उच्चार 'ऑ' बरोबर अर्धा 'ए' जोडल्याने जो द्रुत उच्चार होईल तसा आहे.

उदा. দৈব याचा खरा उच्चार 'दोइबो' किंवा 'दाइबो' असा न होता 'दाएबो' होईल.

(पश्चिम बंगालमध्ये होणाऱ्या 'ओइ' उच्चारा प्रमाणे 'ঐ' चा उच्चार करावा. )

ও :- (१) साधारणतः ऱ्हस्व 'ओ' सारखा उच्चार होतो. [ So मधील 'o' प्रमाणे ]

उदा. ওজন ( ओजोन् ); কোমল ( कोमोल् ); তোরণ ( तोरोन् ); মোদক ( मोदोक् )

(२) कधीकधी दीर्घ पण उच्चार होतो. [ No मधील 'o' प्रमाणे ]

उदा. সোম ( शोम् ); ভোর ( भोर् ); দোসরা (दोश्रा)

ঔ :- पश्चिम बंगालमध्ये ह्याचा उच्चार 'ओउ' च्या द्रुत उच्चाराप्रमाणे करतात.

उदा. গৌর ( गोउर् ); দৌলত ( दोउलोत् ): পৌর ( पोउर, पोउरो ); সৌধ ( शोउध, शोउधो )

पूर्व बंगालमध्ये ह्याचा उच्चार 'ऑउ' च्या द्रुत उच्चाराप्रमाणे करतात.

उदा. গৌর ( गॉउर् ); দৌলত ( दॉउलोत् )

(२) ह्याचा खरा उच्चार 'ऑ' बरोबर अर्धा 'ओ' जोडल्याने जो द्रुत उच्चार होइल तसा आहे.

उदा. কৌটা याचा खरा उच्चार 'कोउटा' किंवा 'कॉउटा' असा न होता 'कॉओटा' असा होईल. (पश्चिम बंगालमध्ये होणाऱ्या 'ओउ ह्या उच्चाराप्रमाणे 'ঔ' चा उच्चार करावा.)

